**महिला व बाल विकास विभागांतर्गत कार्यरत असलेल्या बालकांसाठीच्या सर्व शासकीय, निमशासकीय व स्वयंसेवी संस्थांमधील बालके तसेच महिलांसाठीच्या कार्यरत सर्व शासकीय व स्वंयसेवी संस्थांमधील महिला प्रवेशितांचे आधार कार्ड बनविण्याबाबत.॰ (दिनांक १४ नोव्हेंबर २०१४ ते ३१ डिसेंबर २०१४ मोहीम)**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र. १८१ /का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय मुंबई - ४०००३२
तारीख: १३ नोव्हेंबर, २०१४.

**प्रस्तावना :-**

भारतीय नागरिकांना सार्वजनिक ओळखपत्र आधार कार्डच्या माध्यमातून देण्याचा उपक्रम केंद्र शासना मार्फत राबविला जात आहे. त्यानुसार आधार कार्ड हे प्रत्येकालाच दैनंदिन व्यवहारात तसेच खाजगी व सार्वजनिक जीवनात उपयुक्त ठरत आहेत. ही बाब विचारात घेवून महिला व बाल विकास विभागामार्फत राबविल्या जाणा-या महिला व बालकांसाठीच्या सर्व निवासी गृहांमधील बालकांचे व महिलांचे आधार कार्ड बनविणे आवश्यक ठरते त्या दृष्टीने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत राबविल्या जाणाऱ्या बालकांसाठीच्या सर्व निवासी संस्थांमधील बालकांचे व महिलांचे आधारकार्ड तयार करण्यासाठी खालील कार्यपध्दती अवलंबिण्यात येत आहे

१. प्रत्येक जिल्हयाच्या जिल्हा महिला व बाल विकास अधिका-यांनी जिल्हयात कार्यरत असलेल्या महिला व बालकांसाठीच्या शासकीय , निमशासकीय, स्वयंसेवी संस्थाची यादी अद्ययावत करावी. त्यात संस्थेचे नाव, पत्ता, संपर्क, ई- मेल आयडी, प्रवेशित मंजुर संख्या, उपस्थिती इ माहीती असणे आवश्यक आहे.
२. प्रत्येक संस्थेच्या अधिक्षकांवर / संस्थेतील सर्व प्रवेशितांचे आधार कार्ड बनविण्याची जबाबदारी निश्चित करावी. यासाठी त्याला संबधित संस्थेचा संपर्क अधिकारी म्हणून घोषित करावे.
३. संबधित अधिक्षकाने संस्थेतील सर्व प्रवेशितांची नावे, वय, लिंग, पत्ता, पालक, व आधार कार्डच्या अनुषंगाने आवश्यक इतर माहितीसह यादी अद्ययावत करावी. आवश्यकता भासेल

त्याठिकाणी संबधित संस्थेने पालकांची जबाबदारी स्वीकारून दस्ताऐवज तयार करावे/ द्यावेत.

४. वरील प्रमाणे तयारी केल्यानंतर जिल्हयातील आधार कार्ड वितरीत करणा-या जिल्हयाच्या प्रमुख यंत्रणेशी / अधिका-यांशी संपर्क साधून संस्थानिहाय आधारकार्ड बनविणेकामी दिनांक निश्चित करून तयार केलेल्या यादीच्या क्रमानुसार कागदपत्रे अद्ययावत ठेवून कार्यवाही करावी. सदर प्रकरणी वेळेचा अपव्यय होऊ नये यासाठी पूर्ण तयारी काळजीपुर्वक करावी.

५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी सदर कार्यक्रम "अभियान " धर्तीवर राबवावा. यासाठी महिन्यातील विशिष्ट कालावधी निश्चित करून त्याचा शुभारंभ मान्यवरांच्या हस्ते (लोक प्रतिनिधी, वरिष्ठ अधिकारी) करावा ,मात्र हा कालावधी एक महिन्यापेक्षा जास्त असु नये.

६. आधार कार्ड बनविण्याचे अभियान १४ नोव्हेंबर, २०१४ या बालदिनानिमित्ताने सुरूवात करून डिसेंबर२०१४ , अखेरपर्यंत पूर्ण केले जावे.

७. सर्व विभागीय उपआयुक्त (महिला व बालविकास) यांना सूचित करण्यात येते की, या कामी आवश्यक ते सहकार्य जिल्हा महिला व बाल विकास अधिका-यांना करावे. तसेच डिंसेबर , २०१४ अखेर विभागातील सर्व निवासी संस्थांमधील महिला व मुलांचे आधार कार्ड काढण्यात आले असल्याचे प्रमाणपत्र आयुक्तालयास / शासनास सादर करावे.

८. उपआयुक्त बाल विकास व महिला विकास यांनी सदर प्रकरणात समन्वयकाची भुमिका बजावावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201411121656571630 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: CN = Vinod Sheshrao Bondre, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development
Reason: I am the author of this document
Date: 2014.11.13 11:41:59 +05'30'

विनोद बोंदरे
कक्ष अधिकारी

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव.
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. महासंचालक, UIDAI, मुंबई.

९. मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

१०. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बालविकास

११. मुख्य अधिकारी, चिल्ड्रेन्स एड् सोसायटी, माटुंगा, मुंबई.

१२. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.

१३. सर्व उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. निवड नस्ती, का-८.